वितरण आदेश क्र.४

**राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत मंजूर तरतूदीमधून राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा पुणे, ६ विभागीय व ३५ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांना प्रशासकीय प्रशिक्षणाकरिता, (प्रशिक्षण शुल्क) प्रशासकीय व वित्तीय मान्यता देऊन, लेखा अनुदानाच्या मर्यादेत निधी वितरीत करण्याबाबत**

**योजनांतर्गत सन २०१७-१८**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः यशदा २०१६/प्र.क्र.१११/१६/१२ अ**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २१ एप्रिल, २०१७.

वाचा : १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प,३ दि.१ एप्रिल, २०१७.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१७/ प्र.क्र.७०/२०१७/२५, दि.५ एप्रिल, २०१७

३. संचालक, राज्य प्रशिक्षण नियोजन मूल्यमापन यंत्रणा यशदा पुणे यांचे क्र.राप्रनिमूयं/प्रक्र.८६/२०१७-१८/ दि. १७ एप्रिल,२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाचे प्रशिक्षण धोरण प्रभावीपणे राबविण्याकरिता यशदा पुणे, या संस्थेमध्ये वर्ग १ चे अधिकारी, विभागीय संस्थांमध्ये वर्ग २ व वर्ग ३ चे अधिकारी व कर्मचारी व जिल्हा स्तरीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांमध्ये वर्ग ३ व वर्ग ४ च्या कर्मचा-यांकरिता प्रशासकीय प्रशिक्षण घेण्याचे निश्चित झाले आहे. या प्रशिक्षणार्थ्यांकरिता निवास व भोजन व्यवस्था व इतर प्रशिक्षण संबंधित सर्व अनुषंगिक बाबी याकरिता १ नोव्हेंबर,२०१४ च्या शासन निर्णयान्वये यशदा पुणे, विभागीय व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांसाठी निवासी प्रशासकीय प्रशिक्षणाचे शुल्क मंजूर करण्यात आले आहे. त्याचप्रमाणे, नवीन विषयाची तोंड ओळख या एक दिवसीय अनिवासी प्रशिक्षणाकरिता दि.३०.४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये यशदा पुणे, विभागीय व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांसाठी प्रशिक्षण शुल्क मंजूर करण्यात आले आहे.

त्यानुसार, संचालक, राप्रनिमूयं, यशदा पुणे यांनी, संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये यशदा पुणे, ६ विभागीय व ३६ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थामध्ये एकूण ८०८०२ इतक्या प्रशिक्षणार्थी यांना पायाभूत प्रशिक्षण, पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण, उजळणी प्रशिक्षण व नविन विषयाची तोंडओळख या ४ प्रकारच्या प्रशासकीय प्रशिक्षणाचा आराखडा तयार करुन या संस्थांना प्रशिक्षणाकरिता प्रशिक्षण शुल्क म्हणून रु. २७००.०० लाख इतक्या आवश्यक असणा-या निधी मागणीच्या प्रस्तावास मान्यता देण्याचे प्रस्तावित केले आहे.

तथापि, यशदा कडून रु. २७००.०० लाख इतक्या रक्कमेचा प्राप्त झालेला प्रशिक्षण आराखडा **अंतिम** करण्यात येऊन, त्यास नियोजन व वित्त विभागाची प्रशासकीय मान्यता प्राप्त होण्यास काही कालावधी लागण्याची शक्यता आहे. त्याचप्रमाणे सद्य:स्थितीत आता सर्व संस्थांमध्ये प्रशासकीय प्रशिक्षण सुरु झाले असून, प्रशिक्षणार्थीच्या दैनंदिनी खर्चाकरिता निधी उपलब्ध करुन देणे क्रमप्राप्त आहे. त्यामुळे हा खर्च भागविण्यासाठी काही ठोस रक्कम यशदा पुणे, ६ विभागीय व ३५ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांना निधी वितरित करण्याकरिताच्या प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब या नस्तीवर विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्य प्रशिक्षण धोरणाच्या अंमलबजावणीसाठी मागणी क्र. ए-०४, २०७०-इतर प्रशासकीय सेवा ००-००३-प्रशिक्षण ००-१०- राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय्य यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१-सहायक अनुदान, कार्यक्रमावरील खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता संदर्भाधीन क्र. १ च्या शासन परिपत्रकान्वये एकूण रु.२७००.०० लाख ( अक्षरी रुपये सत्तावीस लाख फक्त ) इतकी तरतूद अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये करण्यात आली. संदर्भाधीन क्र. २ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीनुसार लेखाअनुदान म्हणून एप्रिल व मे २०१७ या दोन महिन्याच्या कालावधीकरिता रु. ४५०.०० लाख ( रुपये चारशे पन्नास लाख फक्त ) इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे.

**१.** राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणेअंतर्गत आता सदर अनुदानाच्या मर्यादेत यशदा पुणे, ६ विभागीय संस्था व ३५ जिल्हास्तरीय संस्थांमध्ये घेण्यात येणा-या प्रशासकीय प्रशिक्षणाकरिता, प्रथम दोन महिन्याच्या प्रशिक्षण शुल्काच्या खर्चापोटी खाली दिलेल्या तक्त्यानुसार रु.४,५०,००,०००/- ( रुपये चार कोटी, पन्नास लाख फक्त ) इतक्या खर्चास वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून त्याचप्रमाणे, वित्त विभागाचे शासन परिपत्रक दि. १८.४.२०१७ अन्वये परिच्छेद ७ मधील (अ) नुसार प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **संस्था** | **एप्रिल व मे २०१७ या दोन महिन्याच्या कालावधीकरिता निधी वितरण** | **एप्रिल व मे २०१७ या दोन महिन्याच्या कालावधीकरिता निधी वितरण** |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | यशदा पुणे | रू.१२५.०० लाख | रु.१२५.०० लाख |
| २ | ६ विभागीय संस्था | १. ५ विभागीय संस्थांकरिता प्रत्येकी रु.३०.०० लाख<br>२. रामेती,खोपोली,रायगड या विभागीय संस्थेस रु.५ लाख | १. रु.१५०.०० लाख<br>२ रु. ५.०० लाख<br>एकूण रु. १५५.०० लाख |
| | ३६ जिल्हा संस्था | प्रत्येकी रू. ५.०० लाख ( ३५ जिल्हा संस्थाकरिता ) | रु. १७५.०० लाख |
| | | **एकूण** | **रु.४५०.०० लाख** |

३. सदर मान्यतेच्या अधीन राहून, ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था व ३५ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था यांना सूचित करण्यात येते की, सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी ८०८०२ प्रशिक्षणार्थी यांना प्रशिक्षण देण्याचे उद्यिष्ट निश्चित करण्यात आले असल्यामुळे, नियोजित व अद्ययावत प्रशिक्षण आराखडा स्वतंत्र आदेशान्वये आपणांस प्राप्त करुन देण्यात येईल. तसेच, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा पुणे, यांनी ३५ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था यांना उपरोक्त तक्त्यातील अनुक्रमांक ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे निधी वितरित करावा.

४. यासाठी होणारा **( रु.१२५.०० लाख यशदा पुणे + रु.१५५.०० लाख ६ विभागीय संस्था + रु.१७५.०० लाख ३५ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था ) एकूण रु. ४५०.०० लाख ( अक्षरी रुपये चारशे पन्नास लाख फक्त ) इतका खर्च " मागणी क्र .अे-४-२०७० इतर प्रशासकीय सेवा ०० - ००३ -प्रशिक्षण ०० - १०- राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय यावरील खर्च (२०७० ०८५३ ) ३१ सहायक अनुदान**" कार्यक्रमावरील खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून करण्यात येत आहे.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान व यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने व सर्व विभागीय संस्थांनी तात्काळ कोषागारातून आहरित करावे. सदर अनुदानाची संबंधित कोषागारातून आहरित करण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी.

६. संस्थांनी आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला सदर विनियोग प्रमाणपत्रात बाबनिहाय तपशीलवार खर्चाची नोंद घेऊन तातडीने सादर करावे.

७. राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा पुणे यांनी संस्थांना प्राप्त झालेल्या निधीच्या अनुषंगाने शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात प्रशिक्षणाची माहिती भरून सदर माहिती प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत शासनास प्राप्त होईल, अशा प्रकारे प्रमाणित करुन पाठविणे बंधनकारक करण्यात येत आहे.

८. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९. संस्थेने आर्थिक वर्ष २०१७-२०१८ मधील खर्च मंजूर अनुदानाइतका सीमित ठेवावा.

१०. सदर प्रस्तावास वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून त्याचप्रमाणे, वित्त विभागाचे शासन परिपत्रक दि. १८.४.२०१७ अन्वये परिच्छेद ७ मधील (अ) नुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन रु.४५०.०० लाख (अक्षरी रुपये चारशे पन्नास लाख फक्त) इतका निधी सहायक अनुदान म्हणून वितरित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्रक्र.७५/अर्थ-३ दि. १८ एप्रिल, २०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०४२११६३६३३७००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijaykumar Parshuram Soshte

Digitally signed by Vijaykumar Parshuram Soshte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=106ede43bb7dcc67e6404aaa146fb4c17a872b3754b63c343b66d6b91dd6b276, cn=Vijaykumar Parshuram Soshte
Date: 2017.04.21 16:39:01 +05'30'

( वि.प.सोष्टे )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१, मुंबई

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,

३. मा. अपर मुख्य सचिव ( सेवा ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,

४. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,

५. विभागीय आयुक्त (सर्व विभाग)

६. जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे)

७. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,

८. संचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,

९. संचालक, सर्व विभागीय प्रशिक्षण संस्था ( नागपूर, पुणे, खोपोली, अमरावती, नाशिक, औरंगाबाद )

१०. संचालक /विशेष कार्य अधिकारी / प्राचार्य सर्व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था ( वाहतूक जिल्हा प्रशासकीय संस्था भायखळा वगळून )

११. नियोजन विभाग, ( कार्यासन १४४३) / वित्त विभाग ( व्यय-४/ अर्थसंकल्प-१४) मंत्रालय, मुंबई -३२

१२. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन -२५

१३. निवड नस्ती, कार्यासन-१२-अ